**नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समिती (जिल्हा गोंदिया)**
**प्रशासकीय व निवासी बांधकामास देण्यात आलेली**
**प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.५४/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २२जून,२००९

**संदर्भ** :- १.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडपीई-१०९७/सीआर-४३६०/२६, दि.१२.६.१९९८
२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदिया,यांचे पत्र क्र.जिपगो/साबांवि/डे२/७५४/२००९,दि.१२.२.२००९

**प्रस्तावना :-**

राज्यातील २२ नवनिर्मित पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत, अधिकारी/कर्मचारी निवासस्थाने व गोदाम बांधकाम अशा एकत्रित कामाच्या एकूण रु.१७८.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामांना दिनांक- १२ जून, १९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये नवनिर्मित मौजे सडकअर्जुनी पंचायत समितीचा समावेश आहे. सडकअर्जुनी पंचायत समितीच्या बांधकामाकरीता जिल्हाधिकारी, गोंदीया यांच्याकडून गट.क्र.१८३/०२ मधील १.९२ हेक्टर जागेचा ताबा माहे नोव्हेंबर,२००१ मध्ये मिळाला. त्यानंतर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचे अंदाजपत्रक तयार करण्यात येवून तांत्रिक मान्यतेकरीता अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर यांच्याकडे सादर करण्यात आले होते. अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, नागपूर यांच्याकडून दिनांक ११.६.२००४ रोजी तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर प्रशासकीय इमारतीचे बांधकाम हाती घेण्यात आले. प्रशासकीय इमारतीचे बांधकाम, पोचमार्ग रस्ता बांधकाम, संरक्षक भिंत, जमीन सपाटीकरण, टाईप II निवासस्थानांचे बांधकाम इ. कामे सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेवून पूर्ण झालेली असून, सदर कामावर एकूण रु.१७७.९५ लक्ष एवढा निधी खर्च झालेला आहे.

२. नवनिर्मित सडक अर्जुनी पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेस दहा वर्षाचा कालावधी झालेला असल्याने, सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील **प्रकरण**-३, (ड) (३) नियम-२६२ तरतूद विचारात घेता, सन १९९८ मधील मूळ प्रशासकीय मान्यतेतील उर्वरीत कामे मंजूर प्रमा किंमतीत हाती घेणे शक्य नसल्याने, झालेली कामे वगळून, सदरील प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

३. नवनिर्मित सडक अर्जुनी पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामास संदर्भीय दिनांक १२.६.१९९८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता, झालेली कामे वगळून, या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. **२००९०६२३१३५५१३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

कृ.मा.प...

[illegible]

१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.

२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया

४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया

५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया

६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया

७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.

८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर

९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया

१०) सभापती, पंचायत समिती, गोंदीया, जिल्हा गोंदिया

११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सडकअर्जुनी, जिल्हा गोंदिया

१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

[illegible]जनिक वांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२

१[illegible])का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई

**नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समिती (जिल्हा गोंदिया)**
**सभापती निवासस्थान, अधिकारी-कर्मचारी निवासस्थान**
**बांधकाम व उर्वरीत कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.५४/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :-२३ जून.२००९

**संदर्भ** :- १.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडपीई-१०९७/सीआर-४३६०/२६, दि.१२.६.१९९८
२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदिया,यांचे पत्र क्र.जिपगो/साबांवि/डेर/७५४/२००९,दि.१२.२.२००९
३.शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.पंसई २००९/प्र.क्र.९४/ पंरा-७,दि.२२.६.२००९

**प्रस्तावना :-**

नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत, अधिकारी/कर्मचारी निवासस्थाने व गोदाम बांधकाम अशा एकत्रित कामाच्या एकूण रु.१७८.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामांना दिनांक- १२ जून. १९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामधील प्रशासकीय इमारतीचे बांधकाम. पोचमार्ग रस्ता बांधकाम, संरक्षक भिंत, जमीन सपाटीकरण, टाईप-II निवासस्थानांचे बांधकाम इ. कामे सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेवून पूर्ण झालेली असून, सदर कामावर एकूण रु.१७७.९५ लक्ष एवढा निधी खर्च झालेला आहे.

आता, सभापती निवासस्थान टाईप IV, टाईप III निवासस्थान ८, गोदाम बांधकाम-२, अंतर्गत रस्ते व गटारे, कंम्पाऊंड वॉल इ. कामे बाकी असल्याने त्याकरीता संबधित कार्यकारी अभियंता यांनी सा.बां.वि.च्या सन २००८-०९ च्या दरसूचीनुसार रु. १९०.१७ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेवून सादर केले आहे. सडकअर्जुनी पंचायत समितीच्या मूळ प्रशासकीय मान्यतेस दहा वर्षाचा कालावधी झालेला असून, दर वर्षी सा.बां.विभागाच्या दरपत्रकात होत असलेल्या वाढीमुळे मूळ प्रमा किंमतीत वाढ झालेली असल्याने, हाती घ्यावयाच्या रु.१९०.१७ लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या वरील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची अति.मु.का.अ.,जि.प.,गोंदीया यांनी संदर्भीय पत्रान्वये विनंती केली आहे.

नवनिर्मित सडक अर्जुनी पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेस दहा वर्षाचा कालावधी झालेला असल्याने, सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील प्रकरण-३, (ड) (३) नियम-२६२ तरतूद विचारात घेता, सन १९९८ मधील मूळ प्रशासकीय मान्यतेतील उर्वरीत कामे मंजूर प्रमा किंमतीत हाती घेणे शक्य नसल्याने, सदरील मूळ प्रशासकीय मान्यता, झालेली कामे वगळून रद्द करण्याचा निर्णय संदर्भीय दिनांक २२जून,२००९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यानुसार नवनिर्मित सडक अर्जुनी पंचायत समितीच्या निवासी इमारतीच्या व उर्वरीत कामाच्या रु.१९०.१७ लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीच्या निवासी इमारतीच्या व उर्वरीत कामाच्या एकूण रक्कम **रुपये-१,९०,१७,०००/-(रुपये एक कोटी नव्वद लक्ष सतरा हजार फक्त)** इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास खालील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

a) प्रस्तुत इमारतीच्या प्रमाणभूत नमुन्यानुसार मान्य करण्यात आलेल्या बांधकामाच्या आराखड्यात शासनाच्या पुर्वमान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
b) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून कोणत्याही परिस्थितीत दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

८) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

२. प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| **Sr.** | **Description** | **Amount** |
| 1 | Type IV Quarter | Rs. 1550000 |
| 2 | Type III - 8 Quarters | Rs. 1100000 |
| 3 | Construction of Godown 2 nos. | Rs. 2407000 |
| 4 | Internal Road and Drains | Rs. 2360000 |
| 5 | Add Rain Water Harvesting charges (2%) | Rs. 1600000 |
| | **Total -** | **Rs. 19017000** |

३. उपरोक्त बांधकामासाठी अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज, ३१ सहाय्यक अनुदाने (०१) **(०५)** जिल्हा परिषदांच्या **निवासी** इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ **१२५६**) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. **२००९०६२३१४०११९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.
...जापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१०) सभापती, पंचायत समिती, गोंदीया, जिल्हा गोंदिया
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सडकअर्जुनी, जिल्हा गोंदिया
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र. वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग. मंत्रालय, मुंबई
...ली,कार्यासन क्र.पं.रा.७.ग्राम विकास व जलसंधारण विभाग.मत्रालय, मुंबई